**पूर्वपरवानगीशिवाय मुख्यालय सोडणाऱ्या अधिकारी/कर्मचाऱ्याबाबत करावयाची कार्यवाही बाबत....**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण-१०१८/प्र.क्र. १९९ /सेवा-२

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, संकुल इमारत
मंत्रालय, मुंबई-४०० ००१
तारीख: २१ जून, २०१८

**शासन परिपत्रक :-**

शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, क्षेत्रिय कार्यालयातील अधिकारी/कर्मचारी कार्यालयीन दिवशी विहित वेळेत कार्यालयात उपस्थित नसतात. अनुपस्थितीबाबत वरिष्ठांची पूर्वपरवानगी घेत नाहीत. त्याचप्रमाणे अनुपस्थितीबाबत कार्यालयातील वरिष्ठांना त्याबद्दलची पूर्वकल्पना देत नाहीत. तसेच मुख्यालय सोडताना किंवा दौऱ्यासाठी जाताना वरिष्ठांची पूर्वपरवानगी घेत नाहीत. कार्यालयीन शिस्तपालन आणि कार्यक्षम प्रशासनाच्या दृष्टीने ही अतिशय गंभीर बाब आहे.

२. महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक ) नियम, १९७९ च्या नियम ३ मध्ये प्रत्येक शासकीय कर्मचाऱ्यांने नेहमीच कर्तव्यपरायणता ठेवावी आणि शासकीय कर्मचाऱ्याला अशोभनीय ठरेल अशा कोणत्याही गोष्टी करता कामा नयेत. अशी स्पष्ट तरतूद विहीत आहे. कार्यालयात अनुपस्थित राहण्याकरिता किंवा मुख्यालय सोडताना, दौऱ्यावर जाण्यासाठी तसेच परदेश दौऱ्यासाठी जाण्यासाठी वरिष्ठ अधिकाऱ्यांची पूर्वपरवानगी आवश्यक आहे. तथापि, सदर बाबीचे पालन न करता अधिकारी/कर्मचारी विनाअनुमती कार्यालयात अनुपस्थित राहतात तसेच विनापरवानगी दौरे, परदेश दौरे करतात. तसेच मा. मंत्री महोदय आणि वरिष्ठ अधिकाऱ्यांनी बोलाविलेल्या बैठकांना सबळ कारणाशिवाय अनुपस्थित राहत असल्याचे प्रकार वाढीस लागल्याचे निदर्शनास आलेले आहे. अशा गैरवर्तणूकीला आळा घालण्यासाठी खालील प्रमाणे निदेश देण्यात येत आहेत.

(अ) क्षेत्रीय स्तरावर उपसंचालक/जिल्हा शल्यचिकित्सक यांनी त्यांच्या क्षेत्रातील सर्व कार्यालयातील मुख्यालयात विनाअनुमती अनुपस्थित राहणाऱ्या मुख्यालयात वास्तव्यास न राहणाऱ्या अधिकारी/कर्मचारी यांची माहिती संकलित करुन ती आरोग्य सेवा संचालनालयास कळवावी. संचालनालयाने अशी माहिती प्राप्त होताच मुख्यालयात उपस्थित/वास्तव्यास राहण्याबद्दल संबंधित् अधिकारी/कर्मचारी यांना प्रथम सक्त सूचना द्याव्यात. तत्सबंधी केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.

(आ) अधिकारी/कर्मचारी विनाअनुमती कार्यालयात गैरहजर राहील्यास/विनाअनुमती मुख्यालय सोडून गेल्यास अशा अधिकारी/कर्मचाऱ्यां विरुध्द निलंबन/शिस्तस्तभंगविषयक कार्यवाही करण्यारिता त्यांची नांवे नियुक्ती अधिकाऱ्यांना कळवावीत व आवश्यकतेनुसार शिस्तभंग विषयक कारवाईचा प्रस्ताव शासनास सादर करण्यात यावा.

(इ) नियुक्ती अधिकाऱ्यांनी अशी नांवे प्राप्त झाल्यापासून अथवा अशा गैरवर्तणूकीच्या बाबी अन्य प्रकारे त्यांच्या निदर्शनास आल्यापासून एक महिन्याच्या आत कसूरदार अधिकारी/कर्मचाऱ्यांना सेवेतून निलंबित करुन शिस्तभंग विषयक कार्यवाही सुरु करावी.

(ई) वरील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे असे आदेशित करण्यात येत आहे. त्यात कोणतीही कुचराई झाल्याचे आढळून आल्यास संबंधित अधिकाऱ्यांना जबाबदार धरण्यात येईल. तसेच सर्व अधिकारी /कर्मचारी विनाअनुमती अनुपस्थित राहणार नाहीत/कार्यालयात वेळेवर उपस्थित राहतील व मुख्यालय सोडणार नाहीत तसेच दौरे/परदेश दौरे इ. करणार नाहीत. याबाबत याची सर्व अधिकारी/कर्मचारी यांनी दक्षता घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१४११३७३२०३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Tatoba
Maruti
Kolekar

Digitally signed by Tatoba Maruti Kolekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f6809ddecc0e0507860e37e9935ab3a7013510f4fe04fad27512588a0bc8e15f, cn=Tatoba Maruti Kolekar
Date: 2018.06.21 11:23:14 +05'30'

**( ता. मा. कोळेकर )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, राजीव गांधी जीवनदायी आरोग्य योजना, वरळी , मुंबई
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
४. प्रकल्प संचालक, महाराष्ट्र राज्य एड्स नियंत्रण सोसायटी, वडाळा , मुंबई
५. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
६. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (आरोग्य संस्थेमार्फत राबविण्यात येणारे कार्यक्रम ), मुंबई / अतिरिक्त संचालक, सामाजिक बांधिलकी असलेले कार्यक्रम, पुणे
७. सर्व सह संचालक, आरोग्य सेवा
८. सहसंचालक, आरोग्य सेवा (अ. व प्र.) मुंबई
९. सर्व उपसंचालक, आरोग्य सेवा
१०. सर्व सहायक संचालक, आरोग्य सेवा
११. जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालये (सर्व)
१२. जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१३. वैद्यकीय अधिक्षक, उपजिल्हा रुग्णालये (सर्व)
१४. वैद्यकीय अधिक्षक, ग्रामीण रुग्णालये (सर्व)
१५. वैद्यकीय अधिक्षक, मनोरुग्णाल (सर्व)
१६. वैद्यकीय अधिक्षक, स्त्री रुग्णालय (सर्व)
१७. निवडनस्ती सेवा-२